जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२१-२२ अंतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून उपजिल्हा रुग्णालय, कर्जत, जि. अहमदनगर रुग्णालयाकरीता रुपये १४.९९ कोटी इतक्या रकमेचे १.५ Tesla एम. आर. आय मशीन निविदा प्रक्रीया राबवुन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.२४६/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०२ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती अहमदनगर यांचे पत्र क्र.जिनिस/ जिवायो /संकीर्ण/२१-२२/सांस-२/१२१९/२०२१ दि. १६.११.२०२१
२) शासन पत्र सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. खरेदी-२०१८/प्र.क्र.९४/आरोग्य -८ दि. १७.१२.२०२१
३) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालय(राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/जिवायो/२१/कर्जत/ एम आर आय/तां. मा/२०७१२/२१ दि.२२.१२.२०२१
४) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालय(राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/जिवायो/२१/कर्जत/ एम आर आय/ तां. मा /२२८९७/२१ दि.२८.१२.२०२१
५) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती अहमदनगर यांचे पत्र क्र.जिवायो/२१-२२/संकिर्ण/सं-स-४/२३२/२०२२ दि. १८.०२.२०२२

**प्रस्तावना:-**

जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती अहमदनगर यांनी त्यांच्या दिनांक १६.११.२०२१ व दि. १८.०२.२०२२ रोजीच्या प्रस्तावात नमूद केल्यानुसार जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२१-२२ अंतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून उपजिल्हा रुग्णालय, कर्जत, जि. अहमदनगर या रुग्णालयाकरीता अंदाजित रुपये १४,९९,००,०००/- (अक्षरी रुपये चौदा कोटी नव्यान्नव लक्ष फक्त) इतक्या रकमेचे १.५ Tesla एम. आर. आय मशीन खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपजिल्हा रुग्णालय, कर्जत, जि. अहमदनगर रुग्णालयाकरीता १.५ Tesla एम. आर. आय मशीन खरेदीसाठी अंदाजित रुपये १४,९९,००,०००/-

(अक्षरी रुपये चौदा कोटी नव्यान्नव लक्ष फक्त) इतका खर्च अपेक्षित असुन सदर खरेदीसाठी येणारा एकूण खर्च अंदाजित रुपये १४,९९,००,०००/- (अक्षरी रुपये चौदा कोटी नव्यान्नव लक्ष फक्त) इतका सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत उपलब्ध व मंजूर अनुदानातून भागविण्यात येणार आहे.सदर बाबींच्या खरेदीसाठी खालील परिच्छेद क्र.०३ मध्ये नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे .सदर खरेदीसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

## अ-अनुदानाचा तपशिल

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | अनुदान स्त्रोत | प्रस्तावित खरेदीची बाब | नग | एकुण खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | सन २०२१-२२ जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत उपलब्ध व मंजूर अनुदान | १.५ Tesla एम. आर. आय मशीन व अन्य बाबी | ०१ | १४,९९,००,००० |

## ब- खरेदीचा तपशील

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | अनुदान स्त्रोत | प्रस्तावित खरेदीची बाब | नग |
|---|---|---|---|
| १ | सन २०२१-२२ जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत उपलब्ध व मंजूर अनुदान | १.५ Tesla एम. आर. आय मशीन व अन्य बाबी | ०१ |
| **एकूण खरेदी रक्कम रुपये** | | | **१४,९९,००,०००** |

<u>बाबनिहाय खरेदीचा तपशील</u> (रक्कम रुपयांत)

| Sr No. | Item Description | Quantity | UOM | Unit Cost | Amount |
|---|---|---|---|---|---|
| 1 | MRI 1.5 Tesla | 1 | Nos | 114406780 | 114406780 |
| 2 | wall and Floor Panelling | As Per Requirement | Nos | 950339 | 950339 |
| 3 | MGPS | As Per Requirement | Nos | 1517966 | 1517966 |
| 4 | Industrial Grade Cooling System | As Per Requirement | Nos | 391780 | 391780 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 5 | video Monitoring system | As Per Requirement | Nos | 586017 | 586017 |
| 6 | Fitouts basis bareshell | As Per Requirement | Nos | 1260508 | 1260508 |
| 7 | Medical Grade Approved Workstations | As Per Requirement | Nos | 651780 | 651780 |
| 8 | Lead Panelling as per AERB norms | As Per Requirement | Nos | 2309831 | 2309831 |
| 9 | Fire Alarm system | As Per Requirement | Nos | 204153 | 204153 |
| 10 | Console station | As Per Requirement | Nos | 399322 | 399322 |
| 11 | Display panel | As Per Requirement | Nos | 330424 | 330424 |
| 12 | Stabilizer | As Per Requirement | Nos | 366864 | 366864 |
| 13 | Outdoor Electrical wiring | As Per Requirement | Nos | 624153 | 624153 |
| 14 | Gas Outflow System | As Per Requirement | Nos | 467966 | 467966 |
| 15 | Gen Set | As Per Requirement | Nos | 2650678 | 2650678 |
| 16 | Sub Total | | | | 127118561 |
| 17 | GST at 18% | | | | 22881340 |
| **18** | **TOTAL** | | | | **149999901** |

०२. जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२१-२२ अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, कर्जत, जि. अहमदनगर रुग्णालयाकरीता रुपये १४.९९ कोटी इतक्या रकमेचे १.५ Tesla एम. आर. आय मशीन खरेदी करणे या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतच्या जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन, अहमदनगर यांच्या दिनांक. १६.११.२०२१ रोजीच्या प्रस्तावासोबत त्यांनी जिल्हा शल्य चिकित्सक,अहमदनगर यांनी सादर केलेली खालील प्रमाणपत्रे सोबत पाठविली आहेत.

अ. दिनाक. ०८.१०.२०२१ व दि. १७.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये एम.आर.आय. मशीन साठी येणाऱ्या खर्चाचे अंदाजपत्रक.

ब. ,सदर मशीन खरेदी इतर कोणत्याही योजने मध्ये समावेश नसल्याबाबतचे दि.०९.०७.२०२१ रोजीचे प्रमाणपत्र

क.दिनांक. ०९.०७.२०२१ रोजीचे वार्षीक देखभाल प्रमाणपत्र,

ङ दिनांक. १६.०७.२०२१ रोजीचे प्रशिक्षीत मनुष्य बळाचे प्रमाणपत्र इत्यादी माहीती सादर केली आहे.

ई. सदर एम.आर.आय. मशीन खरेदी करण्यासाठी सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालय(राज्यस्तर),मुंबई यांनी त्यांच्या दि. ०८.१०.२०२१ एक अति विशेष बाब म्हणुन तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे.

**०३.** जिल्हाधिकारी अहमदनगर यांनी दि.१६.११.२०२१ रोजी सादर केलेल्या प्रस्तावानुसार जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२१-२२ अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, कर्जत, जि. अहमदनगर रुग्णालयाकरीता रुपये १४.९९ कोटी इतक्या रकमेचे १.५ Tesla एम. आर. आय मशीन खरेदी करणे या कामासाठी जिल्हाधिकारी अहमदनगर यांच्या स्तरावर निधीची उपलब्धता होणार आहे व सर्व तांत्रिक बाबींची पुर्तता करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, अहमदनगर व जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर यांची असल्याने खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून एम.आर. आय. मशीन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**०१.** १.५ Tesala एम.आर.आय. वित्त विभाग शासन निर्णय दि. १७.४.२०१५ व दि. ३०.६.२०१५ , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दि. १.१२.२०१६ शासन निर्णय दि. २७ मार्च २०१९ नुसार तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाचे पत्र क्र. खरेदी-२०१८/प्र.क्र.९४/आरोग्य-८ दि.१७.१२.२०२१.नुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०२.** १.५ Tesala एम. आर. आय. मशीन खरेदी करण्याकरिता सदरहू साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत जिल्हा शल्य चिकित्सक,अहमदनगर यांनी खातरजमा करावी .तसेच प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

**०३.** १.५ Tesala एम.आर.आय. मशीन सुरु करण्यासाठी संपूर्ण Turnkey basis वर बांधकाम आणि मशीन खरेदी यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) यामधून अनुदान उपलब्ध करून देण्यात यावे.

**०४.** सदर मशीन स्थापित करण्याकरीता या विभागाकडून कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त अनुदान मिळणार नाही याची नोंद घ्यावी. तसेच सदरील खरेदी पंचसूत्रीच्या अधिन राहून करण्यात यावी,

०५. सदर मशीनचा वापर मशीनच्या नॉर्मनुसार होईल याची खातरजमा जिल्हा शल्यचिकित्सक, अहमदनगर यांनी करावी.

०६. सदर मशीन तज्ञांच्या अभावी विना वापर पडून रहाणार नाही, याची दक्षता जिल्हा शल्य चिकित्सक ,अहमदनगर यांनी घ्यावी.

०७. प्रस्तावित बाबींचे दर हे बाजारभावापेक्षा तसेच हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळ यांचे दरापेक्षा जास्त नसल्याची खात्री जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर यांनी करावी.

०८. खरेदी करावयाची यंत्रसामुग्री ही विहित केलेल्या निकषानुसारच खरेदी करण्यात यावी.

०९. प्रस्तावित खरेदीची बाब जिल्हा वार्षीक योजना (सर्व साधारण) सन २०२१-२२ अंतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून प्रस्तावित केलेली आहे, त्याच अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यांत यावा.

१०. प्रस्तावित खरेदी बाब उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेतच करण्यात यावी.

११. प्रस्तावित खरेदी प्रक्रिया दरम्यान वरील अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी तसेच या संदर्भात कोणत्याही प्रकारची अनियमितता झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी जिल्हा शल्य चिकित्सक,अहमदनगर यांची राहिल.

१२. प्रस्तावित बाबींची वार्षिक मागणीपेक्षा जास्त खरेदी करण्यात येऊ नये, याबाबत जिल्हा शल्य चिकित्सक , अहमदनगर यांनी स्वतः खातरजमा करुनच पुरवठा आदेश निर्गमित करावेत.

१३. प्रस्तावित खरेदी ई-निविदा प्रक्रियेव्दारे जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, अहमदनगर यांच्या स्तरावर करण्यात यावी.

१४. जिल्हा नियोजन विकास मंडळाने मंजूर केलेला निधी विहित कालावधीमध्ये पूर्ण खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

१५. Turn Key work याबाबतचे सविस्तर अंदाज आराखडे बांधकाम विभाग यांच्याकडून तपासुन घेणे आवश्यक आहे. तसेच योग्य ते Electric load calculation करणे आवश्यक आहे.

१६. **खालील बाबी लक्षात घेता एम.आर.आय. मशीन सुरु करण्यासाठी आवश्यक तांत्रिक बाबी उपलब्ध करुन घेऊन मगच पुढील कार्यवाही जिल्हा नियोजन समितीने करणे आवश्यक आहे**.

अ) सदर मशीन Turnkey Basis वर स्थापित (Install) करावी.

ब) मशीन चालविण्यासाठी पुढील पाच वर्षासाठी आवश्यक तंत्रज्ञ, सपोर्ट स्टाफ, रेडिओलॉजिस्ट, यांची नेमणूक ५ वर्षासाठी जिल्हा वार्षिक योजनेमार्फत करण्यात यावे,

क) २ वर्षाचा वॉरंटी कालावधी व त्यानंतर ५ वर्षाची देखमाल दुरुस्ती करार खरेदीत अंर्तभूत करण्यात यावेत. तसेच इलेक्ट्रीक बॅकअप सुध्दा जिल्हा वार्षिक योजनेमधून करणे आवश्यक राहिल.

ड) एमआरआय नंतर लागणारे न्युरॉलॉजिस्ट, सर्जरी, फिजिशियन, ऑर्थोपेडिक सर्जन, ईएनटी सर्जन, ऑपथॅल्मिक सर्जन, ऑन्कॉलॉजिस्ट इतर विशेषतज्ञ यांची उपलब्धता कंत्राट पध्दतीने/नियमित पदे नसल्यास,त्याबाबतची व्यवस्था जिल्हा वार्षिक योजना मधून उपलब्ध करून देणे आवश्यक राहील,

किंवा **तांत्रिक कर्मचाऱ्यांबाबत आमदार मानधन/CSR/Companyयांचेकडील निधीमधुन शासनाकडुन मंजुरी मिळत नाही तो पर्यंत सदर व्यवस्था निर्माण करण्याची कार्यवाही करण्यात यावी .**

**१७. एकदा M.R.I Install केल्यानंतर ती पुन्हा हलविण्यात येणार नाही. या अटींच्या अधिन राहून परवानगी देण्यात येत आहे**.

१८. सदरहू साहित्य सामुग्रीची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

**१९**. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

**२०**. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

**२१**. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

**२२**. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

**२३**. तसेच सदर खरेदीसाठी येणारा एकूण खर्च जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन, अहमदनगर यांनी नमुद केल्याप्रमाणे सन २०२१-२२ अंतर्गत जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

**२४**. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

**२५**. संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

**२६**. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

**२७**. खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** उपरोक्त परिच्छेद क्र. ०३ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, अहमदनगर व जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर यांची राहील.

**०५.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४११४५५२१०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.02 13:06:27 +05'30'

**(वि.ल.लहाने)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती,अहमदनगर.
४) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
५) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.

६) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
८) जिल्हा शल्यचिकित्सक,अहमदनगर,जिल्हा अहमदनगर.
९) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
११) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
१२) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१४) अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)